**"आचार्य बाळशास्त्री जांभेकर पत्रकार सन्मान" योजना- प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.मावज-२०१३/प्र.क्र. १९५/का.३४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक:- ०२ फेब्रुवारी, २०१९**

**<u>वाचा</u> :** माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.वृत्त (२०१८) /पत्रकार सन्मान योजना/ का-२/५९, दि.१९ जानेवारी,२०१९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

पत्रकारांना निवृत्तीवेतन देण्यासंदर्भातील मागणी, विविध पत्रकार संघटना, लोकप्रतिनिधी, विधानमंडळ सदस्य यांच्याकडून शासनाकडे वारंवार करण्यात येत होती. प्रसिध्दी माध्यमे हा भारतीय लोकशाहीचा चौथा आधारस्तंभ आहे. राज्य शासन सर्वसामान्य नागरीकांसाठी ज्या लोकोपयोगी योजना जाहीर करते, त्याची व्यापक प्रचार व प्रसिध्दीचे कामकाज, माध्यमे व त्यामध्ये काम करणारे पत्रकार निरपेक्ष भावनेने करीत असतात. त्यामुळे राज्यातील ज्येष्ठ पत्रकारांप्रती आदरभाव, कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्यांना आर्थिक सहाय्य मिळावे यासाठी पत्रकार सन्मान योजना सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पत्रकारांना आर्थिक सहाय्य करण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या, "शंकराराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी या योजने" च्या विश्वस्त मंडळामार्फत ज्येष्ठ पत्रकारांसाठी, "आचार्य बाळशास्त्री जांभेकर सन्मान योजना" राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अ) सदर संस्थेच्या विश्वस्त मंडळाने शिफारस केल्यानुसार या योजनेच्या लाभार्थ्यांच्या पात्रतेसाठीचे निकष खालील प्रमाणे राहतील,**

१. वृत्तपत्र आणि इतर वृत्तप्रसार माध्यम संस्था यांचे संपादक, ३० वर्षे पत्रकार म्हणून काम केलेले व वय वर्षे ६० पूर्ण झालेले ज्येष्ठ पत्रकार.

२. किमान सलग ३०वर्षे श्रमिक पत्रकार/ छायाचित्रकार म्हणून सेवा करुन सेवानिवृत्त झालेले व किमान ६० वर्षे वय पूर्ण झालेले पत्रकार/छायाचित्रकार.

३. किमान सलग ३०वर्षे स्वतंत्र व्यवसायी पत्रकार/छायाचित्रकार म्हणून पत्रकारिता/ छायाचित्रकार म्हणून पत्रकारिता करुन निवृत्त झालेले व किमान ६० वर्षे वय पूर्ण झालेले स्वतंत्र व्यवसायी पत्रकार, छायाचित्रकार.

४. किमान सलग १० वर्षे अधिस्वीकृतीधारक असलेले पत्रकार व वयाची ६० वर्षे पूर्ण झालेला असावा.

५. अधिस्वीकृतीधारक नसलेल्या पत्रकारांच्याबाबतीत अधिस्वीकृतीपत्रिकेसाठी असलेले निकष पूर्ण करीत असलेले पत्रकार यांचा योजनेसाठी विचार करण्यात येईल. याबाबत निर्णय घेण्याचा अधिकार समितीला असेल.

६. ज्या पत्रकारांना इपीएफ योजना (कर्मचारी भविष्य निर्वाह निधी) व्यतिरिक्त इतर कोणत्याही स्रोतातून निवृत्ती वेतन किंवा निवृत्ती वेतनविषयक लाभ मिळालेले/ मिळत नसेल अशा पत्रकारांसाठीच ज्येष्ठ पत्रकार सन्मान योजना लागू राहील.

७. उपरोल्लेखित ज्येष्ठ पत्रकार की ज्याची उपजिविका केवळ पत्रकारितेवर अवलंबून आहे आणि अन्य कोणत्याही नोकरी/व्यवसाय यामध्ये नाही/नव्हते असे ज्येष्ठ पत्रकार.

८. गंभीर गुन्ह्यामध्ये दोषसिध्दी होवून शिक्षा झालेली आहे अशा पत्रकारांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय नसेल.

९. या योजनेसाठी ज्येष्ठ पत्रकार ज्या प्रसार माध्यमामध्ये पत्रकारिता करुन निवृत्त झाले त्या प्रसार माध्यमातील संबंधित वृत्तपत्र नियमित असावे, वृत्तवाहिनी असल्यास ती अधिकृत व सक्षम प्राधिकाऱ्यांकडे नोंदणीकृत असावी.

१०. या योजनेसाठी लाभ घेऊ इच्छिणारा पत्रकार आयकर भरणारा नसावा.

११. सदर सन्मान योजने अंतर्गत आर्थिक मदतीची रक्कम लाभार्थी हयात असेपर्यंतच मिळेल. लाभार्थी पत्रकाराच्या मृत्यूपश्चात सदर सन्मान योजनेचा लाभ त्याच्या कुटुंबियास देय असणार नाही.

**ब) कार्यपध्दती:-**

१. या योजनेसाठी ज्येष्ठ पत्रकाराने “आचार्य बाळशास्त्री जांभेकर पत्रकार सन्मान” योजनेमधून लाभ मिळण्यासाठी संबंधित जिल्हा माहिती अधिकारी/ उपसंचालक (विभागीय माहिती कार्यालय) / उपसंचालक (वृत्त), मुंबई यांच्याकडे आवश्यक त्या कागदपत्रांसह अर्ज सादर करावा.

२. अर्ज माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील महासंचालक, (माहिती व जनसंपर्क) यांच्या अध्यक्षतेखालील समितीकडून तपासण्यात येतील.

३. आचार्य बाळशास्त्री जांभेकर पत्रकार सन्मान योजना अधिस्वीकृतीधारक पत्रकाराने वयाची ६० वर्षे पूर्ण झाल्यानंतरच्या पुढील महिन्यापासून लागू करण्यात यावी.

**क) सादर करावयाची कागदपत्रे**

१. विहित नमुन्यातील अर्ज
२. जन्मतारखेचा पुरावा म्हणून आवश्यक प्रमाणपत्राची साक्षांकित प्रत (शाळा सोडल्याचा दाखला किंवा अन्य पुरावा)
३. शैक्षणिक अर्हतेच्या प्रमाणपत्राची साक्षांकित प्रत
४. अनुभवाचा पुरावा (ज्या ज्या माध्यमात काम केले आहे तेथील आदेश)
५. माध्यमामध्ये काम करताना मिळालेल्या वेतनाचा/मानधनाचा पुरावा
६. वार्षिक उत्पन्नाचा दाखला (सक्षम प्राधिकाऱ्यांनी दिलेला)
७. अर्जातील माहिती खरी असल्याबाबत विहित नमुन्यातील प्रतिज्ञापत्र
८. आधारकार्डाची साक्षांकित प्रत
९. पॅनकार्डाची साक्षांकित प्रत
१०. बँकेतील खाते क्रमांक व बँकेचे नाव (खातेपुस्तिकेच्या पहिल्या पृष्ठाची प्रत)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०२१६३८२१७२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2019.02.02 16:42:26 +05'30'

**(रा. ना. मुसळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सचिव, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
५) संचालक,(माहिती ( प्रशासन) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री (सा.प्र.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

७) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,

८) सर्व संचालक, माहिती व जनंसपर्क महांसचालनालय.

९) सर्व उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय.

१०) सर्व जिल्हा माहिती अधिकारी.

११) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

१४) लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१५) निवडनस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग.